राज्यात नागरी क्षेत्रात होणा-या अनधिकृत बांधकामास प्रतिबंध करणे व त्या विरुध्द प्रभावी कार्यवाही करण्याच्या दृष्टीने राज्य-स्तरीय सनियंत्रण समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक:अतिक्र-०९११/प्र.क्र. २०७ /नवि-२०,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक: ८ सप्टेंबर २०११.

वाचा:-नगरविकास विभागाचा शासन निर्णय क्रमाक -कडोंमपा-१००६ /प्र.क्र.१९२ /२००६/नवि-२८,दिनांक २ मार्च २००९.

**प्रस्तावना:-**

राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषद क्षेत्रात अनधिकृत बांधकामे व सार्वजनिक जागांवरील अतिक्रमणे ही एक चिंतेची बाब झाली आहे. सदर अनधिकृत बांधकामे व अतिक्रमणे यांना आळा घालण्यासाठी व हटविण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करण्यासंदर्भात सखोल निर्देश संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासनाने निर्गमित केले आहेत. तरी देखील अतिक्रमणे व अनधिकृत बांधकामे यांच्या विरुध्द प्रभावीपणे कार्यवाही होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. त्यामुळे महानगरपालिका / नगरपरिषदा यांच्या स्तरावरुन अनधिकृत बांधकाम व अतिक्रमणे यांच्या विरुध्द होणा-या कार्यवाहीचा आढावा घेणे व त्या प्रक्रियेचे सनियंत्रण करण्याकरीता मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली एक राज्यस्तरीय सनियंत्रण समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महानगरपालिका / नगरपरिषद क्षेत्रातील अनधिकृत बांधकामे तसेच सार्वजनिक जागांवरील अतिक्रमणे यांच्या संदर्भात प्रभावीपणे प्रतिबंधात्मक व निष्कासनाची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावर होईल या दृष्टीने सदर कार्यवाहीचा वेळोवेळी आढावा घेऊन त्यांचे सनियंत्रण करण्याकरीता मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय सनियंत्रण समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| २) अप्पर मुख्य सचिव (गृह) | - | सदस्य |
| ३) प्रधान सचिव (महसूल) | - | सदस्य |
| ४) प्रधान सचिव (वने) | - | सदस्य |

५) प्रधान सचिव (नवि-२) - सदस्य सचिव
६) पोलिस महासंचालक - सदस्य
७) पोलिस आयुक्त, मुंबई - सदस्य
८) संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय. - सदस्य
९) सर्व महानगरपालिका आयुक्त - सदस्य

सदर समिती राज्यातील नागरी भागातील अनधिकृत बांधकामे व सार्वजनिक जागांवरील अतिक्रमणांविरुध्द होणा-या प्रतिबंधात्मक व निष्कासन विषयक कार्यवाहीचा त्रैमासिक आढावा घेऊन त्या अनुषंगाने करावयाच्या कार्यवाहीचे संनियंत्रण करेल. सदरहू समितीची बैठक तीन महिन्यातून एकदा घेतली जाईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमाक २०११०९०८१४३८१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( मनु कुमार श्रीवास्तव )
प्रधान सचिव, नगर विकास विभाग.

प्रति--
मा.मुख्यमंत्री सचिवालय,
मा.राज्यमंत्री, नगर विकास,
प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग,
सर्व समिती सदस्य,
निवड नस्ती (नवि-२०).